**ठाणे खाडी पूल क्र. १ व ठाणे खाडी पूल क्र. २ वरील सर्व देखभाल व दुरुस्तीची कामे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडे हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१३८/रस्ते-६,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ जानेवारी, २०१९

<u>वाचा</u>- १) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाचे पत्र क्र. मरारविम/सव्यंस-३/TCB-III/ २०१८/७३३३, दि.१५.१०.२०१८
२) शासन निर्णय,सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. टीओएल-१०९७/सीआर २००४-भाग १/रस्ते-७, दि. ३०.०५.१९९८

**प्रस्तावना :-**

संदर्भीय शासन निर्णयानुसार शीव-पनवेल महामार्गावरील ठाणे खाडी पूल क्र.१ व २ या दोन्ही पुलांच्या देखभाल व दुरुस्तीकरीता महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने निधी उपलब्ध करुन द्यायचा आहे. तसेच सदर पुलांची देखभाल, दुरुस्ती व संनियंत्रण सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रिय विभागाकडून करण्यात यावे, असेही सदर शासन निर्णयात नमूद केले आहे.

दरम्यान सार्वजनिक उपक्रम समितीच्या दि. २१.०८.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत, समितीने ठाणे खाडी पूल क्र. १ व ठाणे खाडी पूल क्र. २ च्या दोन्ही पुलांची देखभाल व दुरुस्तीची सर्व कामे यापुढे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने करावी, असे निर्देश दिले आहेत.

सार्वजनिक उपक्रम समितीच्या शिफारशीनुसार ठाणे खाडी पूल क्र. १ व ठाणे खाडी पूल क्र. २ वरील सर्व देखभाल व दुरुस्तीची कामे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक :-**

ठाणे खाडी पूल क्र. १ व ठाणे खाडी पूल क्र. २ या दोन्ही पुलांच्या सर्व देखभाल व दुरुस्तीची कामे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडे हस्तांतरीत करण्यात येत आहेत.

प्रकल्पांशी संबंधित नस्ती, करारपत्रे, प्रकल्प अहवाल, संकल्पचित्रे व नकाशे (As built Drawing) इत्यादी आवश्यक दस्तऐवज महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी तात्काळ करावी. यापुढे ठाणे खाडी पूल क्र. १ व ठाणे खाडी पूल क्र. २ ची देखभाल व दुरुस्ती कार्यकारी अभियंता, ठाणे खाडी पूल विभाग क्र. १ यांनी करु नये. ही देखभाल व दुरुस्ती महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने स्वखर्चाने करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०१०९१५१२०९९५१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

Sumant Dinkar Pashte

Digitally signed by Sumant Dinkar Pashte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, cn=Sumant Dinkar Pashte
Date: 2019.01.09 15:23:35 +05'30'

**( सु.दि.पाष्टे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
२) मा.मंत्री, (सा.बां.) यांचे खाजगी सचिव
३) मा. मंत्री, ( सार्वजनिक बांधकाम/ सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव (सा.बां.),सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव(रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव(बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई
९) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण
१०) सह सचिव (सेवा)/ सह सचिव (संनियंत्रण)/ आंतरवित्तिय सल्लागार व सह सचिव / उपसचिव (खार-१) व उपसचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२) अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबुर, मुंबई व अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ, (पूल)
१३) निवड नस्ती (कार्या/रस्ते-६).